**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन विभागातील उप मुख्य अग्निशमन अधिकारी, अग्निशमन केंद्र अधिकारी, सहायक अग्निशमन केंद्र अधिकारी, अग्निशमन प्रणेता, चालक-यंत्रचालक, अग्निशामक या पदांसाठी सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ मध्ये सुधारणा करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- मिभाम-११२३/प्र. क्र.२२/नवि-२८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- ०७ जून, २०२३.

**वाचा:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. मिभाम-१११६/प्र.क्र.३६ (भाग-१)/१६/नवि-२८, दि.२६.०२.२०१९.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. मिभाम-१११६/प्र.क्र.३५/१६/नवि-२८, दि.२८.०५.२०१९.
३) मिरा-भाईंदर महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. १४७, दि.०८.१२.२०२२.
४) नगर विकास विभाग, शासन निर्णय, क्र. मिभाम-१११६/प्र.क्र.३५/नवि-२८, दि.२५.११.२०२१.
५) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मिभा/मनपा/आस्था/२३१०/२०२२-२३, दि.०३.०२.२०२३.
६) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मिभा/मनपा/आस्था/२५९१/२०२२-२३, दि.०८.०३.२०२३.

**प्रस्तावना:-**

मिरा-भाईंदर महानगरपालिका सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम,२०१९ यांस संदर्भीय क्र. २ येथील, दि.२८.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर सेवाप्रवेश नियमात मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन विभागातील पदांकरीता नेमणूकीसाठी शैक्षणिक अर्हता व पात्रता विहीत करण्यात आलेली आहे.

२. मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमांमध्ये मंजूर केलेल्या अग्निशमन विभागातील एकूण १० पदांपैकी ७ पदांच्या भरती प्रमाण/अर्हता दुरूस्ती/सुधारणा करण्याबाबत, आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी संदर्भीय दि.०३.०२.२०२३ व दि.०८.०३.२०२३ च्या पत्रान्वये प्रस्ताव शासनाकडे मान्यतेसाठी सादर केला आहे.

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, मिरा-भाईंदर महानगरपालिका सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ मध्ये, अग्निशमन विभागातील विविध पदांकरिता शैक्षणिक अर्हता, भरती प्रमाण/नेमणूकीची पध्दतीसंदर्भात सेवा प्रवेश नियमात तरतूद करण्यात आलेली आहे. तथापि, महानगरपालिकेतील कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध होत नसल्याने, महानगरपालिकेच्या ७ पदांच्या शैक्षणिक अर्हता/नेमणूकीच्या पध्दतीतील दुरूस्तीच्या प्रस्तावापैकी ६ पदांच्या सदर शैक्षणिक अर्हता व भरती पध्दतीमध्ये सुधारणा करणे गरजेचे आहे. यास्तव, महानगरपालिकेच्या सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ मधील तरतूदी पाहता, संदर्भीय दि.२८.०५.२०१९ च्या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-२” मध्ये क्र. ४२ ते ४७ वर, ‘उप मुख्य अग्निशमन अधिकारी’ (श्रेणी-२, अग्निशमन सेवा), ‘अग्निशमन केंद्र अधिकारी’ (श्रेणी-२, अग्निशमन सेवा), ‘सहायक अग्निशमन केंद्र अधिकारी’ (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), ‘अग्निशमन प्रणेता’ (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), ‘चालक-यंत्रचालक’ (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), ‘अग्निशामक’ (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), या ६ संवर्गातील पदाच्या नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीसंदर्भात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

संदर्भीय दि.२८.०५.२०१९ च्या शासन निर्णयासोबतच्या "परिशिष्ट-२" मधील क्र. ४२ ते ४७ येथील 'उप मुख्य अग्निशमन अधिकारी' (श्रेणी-२, अग्निशमन सेवा), 'अग्निशमन केंद्र अधिकारी' (श्रेणी-२, अग्निशमन सेवा), 'सहायक अग्निशमन केंद्र अधिकारी' (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), 'अग्निशमन प्रणेता' (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), 'चालक-यंत्रचालक' (श्रेणी-३, अग्निशमन सेवा), 'अग्निशामक' (श्रेणी-३, अग्निशमन सेवा) या ६ संवर्गाच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीत, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५४, ४५५ व ४६५(१)(ल) अन्वये प्राप्त अधिकारात, मिरा-भाईंदर महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ मध्ये सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. अग्निशमन विभागातील विविध पदांकरिता शैक्षणिक अर्हतेत व पात्रतेत सोबत जोडलेल्या "परिशिष्ट-२, अनुसूची-ड" अन्वये सुधारणेस मंजूरी देण्यात येत आहे.

२. या नियमास "मिरा-भाईंदर महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९" चा सुधारित भाग असे संबोधण्यात यावे.

३. सदर सुधारित नियम, आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावेत. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी करावयाची आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६०७१६५४०४७८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.06.07 17:32:51 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती ( नवि-२८ ).

**शा.नि.क्र.मिभाम-११२३/प्र. क्र.२२/नवि-२८, दि. ०७ जून, २०२३ सोबतचे "परिशिष्ट-२, अनुसूची-ड"**

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | टक्केवारी | मिरा-भाईंदर महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१९ मधील तरतूद | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीत सुधारणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | उप मुख्य अग्निशमन अधिकारी (श्रेणी-२, अग्निशमन सेवा) | पदोन्नती- १००% | मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ०३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील पदवी (B.E. Fire) किंवा राष्ट्रीय अग्निशमनसेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील Divisional Fire Officer पाठयक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका) किंवा The Istitution of Fire Engineers (U.K) किंवा (India) या संस्थेकडील सदस्यत्व (M.I.Fire) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर The Istitution of Fire Engineers (U.K) यांचे सदस्यत्व प्राप्त केलेल्या अधिकाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'अग्निशमन केंद्र अधिकारी' या पदावर किमान ०३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या किंवा 'सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी' या पदावर किमान १० वर्षे सेवा पूर्ण झालेल्या (यापूर्वी लगतच्या २ वर्षात 'अग्निशमन केंद्र अधिकारी' या पदावर पदोन्नती दिली असल्यास मागील सेवा विचारात घेऊन) व राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील पदवी (B.E. Fire) .<br>किंवा<br>राष्ट्रीय अग्निशमनसेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील Divisional Fire Officer पाठयक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका)<br>किंवा<br>The Istitution of Fire Engineers (U.K) किंवा (India) या संस्थेकडील सदस्यत्व (M.I.Fire)<br>किंवा<br>कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर The Istitution of Fire Engineers (U.K) यांचे सदस्यत्व प्राप्त केलेल्या अधिकाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| | | प्रतिनियुक्ती | पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध न झाल्यास, सदर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, राज्य/केंद्र शासन/ निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या सेवेतील समकक्ष पद किमान ०५ वर्षापासून धारण करणाऱ्या योग्य अधिकाऱ्यामधून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. | पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध न झाल्यास, सदर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, राज्य/केंद्र शासन/निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या सेवेतील समकक्ष पद किमान ०५ वर्षापासून धारण करणाऱ्या योग्य अधिकाऱ्यामधून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | अग्निशमन केंद्र अधिकारी (श्रेणी-२, अग्निशमन सेवा) | पदोन्नती-१००% | मिरा भाईदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी' या पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय नागपूर, यांच्याकडील Station Officer & Instructor पाठयक्रम उत्तीर्ण. किंवा<br>क) The Institution of Fire Engineering (U.K) किंवा (India) या संस्थेकडून Grade –I ही पदवी प्राप्त अधिकारी/कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>किंवा<br>ड) मिरा भाईदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी' या पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्याची व मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी धारण करणाऱ्या सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>किंवा<br>इ) मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'अग्निशमन प्रणेता' (लिडींग फायरमन) /चालक-यंत्रचालक या पदावर किमान १० वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी धारण करणाऱ्या (यापूर्वी लगतच्या २ वर्षात 'सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी' या पदावर पदोन्नती दिली असल्यास मागील सेवा विचारात घेऊन), तसेच, उपरोक्त 'ब' किंवा 'क' येथील अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ३ | सहायक अग्निशमन केंद्र अधिकारी (श्रेणी-३, अग्निशमनसेवा) | नामनिर्देशन /सरळसेवा -२५% | अ) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय नागपूर यांचेकडील Station Officer & Instructer पाठयक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाचा कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय नागपूर यांचेकडील Sub Officer पाठयक्रम उत्तीर्ण असावा.<br>किंवा |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | पदविका) उत्तीर्ण असावा किंवा महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन यांचा ०१ वर्ष कालावधीचा उप स्थानक अधिकारी व अग्निप्रतिबंधक अधिकारी हा पाठयक्रम पूर्ण केलेला असावा किंवा The Institution of Fire Engineers (U.K) किंवा (India) या संस्थेकडून Grade-I ही पदवी प्राप्त केलेली असावी.<br>क) "ड" वर्ग महानगरपालिका /शासकीय/निमशासकीय सेवेमध्ये 'अग्निशमन प्रणेता' (लिडींग फायरमन)/ चालक यंत्रचालक या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ०३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी.<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>इ) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.)<br>२) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागु नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>फ) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ४० वर्षापेक्षा अधिक असू नये. | क) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय नागपूर यांचेकडील Station Officer & Instructer पाठयक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका) उत्तीर्ण असावा महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन यांचा ०१ वर्ष कालावधीचा उप स्थानक अधिकारी व अग्निप्रतिबंधक अधिकारी हा पाठयक्रम पूर्ण केलेला असावा किंवा दि इन्स्टीटयुट ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के) किंवा (इंडिया) या संस्थेकडून ग्रेड-आय पदवी प्राप्त केलेली असावी.<br>किंवा<br>ड) "ड" वर्ग महानगरपालिका/ शासकीय/ निमशासकीय सेवेमध्ये 'अग्निशमन प्रणेता' (लिडींग फायरमन)/चालक यंत्रचालक या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ०३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी.<br>ई) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>फ) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.)<br>२) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>ग) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ४० वर्षापेक्षा अधिक असू नये. |
| | | पदोन्नती- ७५% | नामनिर्देशनासाठी विहित केलेली अर्हता धारण करणाऱ्या, मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'अग्निशमन प्रणेता' (लिडींग फायरमन) या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या किंवा 'चालक-यंत्रचालक' या पदावर ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने ५०:५० या प्रमाणात 'अग्निशमन प्रणेता' व 'चालक-यंत्रचालक'या पदांमधून पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय नागपूर यांचेकडील Sub Officer पाठयक्रम उत्तीर्ण करणाऱ्या मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'अग्निशमन प्रणेता' (लिडींग फायरमन) या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या किंवा 'चालक-यंत्रचालक' या पदावर ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या किंवा वरील सवंर्गात पुरेसे कर्मचारी उपलब्ध नसल्याने, पद रिक्त असल्यास, 'अग्निशामक' या पदावर १० वर्ष सेवा झालेल्या कर्मचाऱ्याची (यापूर्वी लगतच्या २ वर्षात 'अग्निशमन प्रणेता' या पदावर पदोन्नती दिली असल्यास, मागील |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | सेवा विचारात घेऊन) सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ४ | अग्निशमन प्रणेता (श्रेणी-३, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा- २५% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा ०६ महिने कालावधीचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम पूर्ण.<br>क)महानगरपालिका/विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय/ निमशासकीय अगिनशमन सेवेमध्ये अग्निशामक पदावर किमान ०३ वर्षे कामाचा अनुभव आवश्यक.<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>इ) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.)<br>२) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागु नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>फ) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा अधिक असू नये | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र/महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन, मुंबई/नागपूर किंवा ऑल इंडिया इंस्टीटयुट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट किंवा महाराष्ट्र राज्य तांत्रिक शिक्षण महामंडळ यांचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम पूर्ण.<br>क)महानगरपालिका/विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय/ निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये अग्निशामक पदावर किमान ०३ वर्षे कामाचा अनुभव आवश्यक.<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>इ) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.)<br>२) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>फ) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा अधिक असू नये. |
| | | पदोन्नती- ७५% | मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'अग्निशामक' या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व नामनिर्देशनासाठी विहित केलेली अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'अग्निशामक' पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ५ | चालक-यंत्रचालक (श्रेणी-३, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा- २५% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC) उत्तीर्ण. | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र/महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन, |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | ब) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा ०६ महिने कालावधीचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम पूर्ण.<br>क) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना आवश्यक.<br>ड) जड वाहन चालक म्हणून किमान ०३ वर्षे काम केल्याचा अनुभव आवश्यक.<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>फ) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.)<br>२) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागु नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>फ) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा अधिक असू नये. | मुंबई/नागपूर किंवा ऑल इंडिया इंस्टीटयुट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट किंवा महाराष्ट्र राज्य तांत्रिक शिक्षण महामंडळ यांचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम पूर्ण.<br>क) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना आवश्यक.<br>ड) जड वाहन चालक म्हणून किमान ०३ वर्षे काम केल्याचा अनुभव आवश्यक.<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>फ) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.)<br>२) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>ग) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा अधिक असू नये. |
| | | पदोन्नती-७५% | मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील ‘अग्निशामक’ या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व नामनिर्देशनासाठी विहित केलेली अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | मिरा भाईंदर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील ‘अग्निशामक’ या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व नामनिर्देशनासाठी विहित केलेली अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ६ | अग्निशामक (श्रेणी-३, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-१००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा ०६ महिने कालावधीचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम पूर्ण.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>ड) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.) | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र/महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन, मुंबई/नागपूर किंवा ऑल इंडिया इंस्टीटयुट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट किंवा महाराष्ट्र राज्य तांत्रिक शिक्षण महामंडळ यांचा अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रम पूर्ण.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>ड) शारीरिक पात्रता :-<br>१) उंची किमान १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची किमान १६२ सें.मी.) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | २) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागु नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>फ) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा अधिक असू नये. | २) छाती-साधारण ८१ सें.मी फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागु नाही)<br>३) वजन-किमान ५० कि.ग्रॅ.<br>४) दृष्टी-चांगली<br>फ) वयोमर्यादा :- उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा अधिक असू नये. |

*************************************************